**महिला व बाल विकास विभागाच्या कार्यरत योजनांचे मुल्यांकन करून योजनांचा सविस्तर आढावा घेणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः बीजीटी-२०१५/प्र.क्र.३८/का.-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक ,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: २१ ऑक्टोबर,२०१५

वाचा :-

१) नियोजन विभागाच्या कार्यासन-१४११ च्या दि. ०२.०५.२०१५ ची टिप्पणी.
२) नियोजन विभागाच्या चे अ.शा. प. क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.२६/का-१४ का दि.१४/७/२०१५ चे अर्ध शासकीय पत्र .

प्रस्तावना:-

महिला व बाल विकास विभागाच्या स्थापनेपासून तत्कालीन परिस्थितीनूसार विविध योजना कार्यान्वित करण्यात आल्या आहेत. आजमितीस या विभागात महिला व बाल कल्याण तसेच एकात्मिक बाल विकास योजना अंतर्गत जवळ पास ५५ ते ६० योजना कार्यरत आहेत. तथापि योजनांची संख्या वाढतच राहिल्यामुळे , अशा योजनांचे मुल्यमापन, फल निष्पती,योजनांच्या लाभार्थ्याच्या संखेत वाढ किवा घट,योजनांवर आता पर्यत झालेला खर्च या सर्व बाबी वर आजपर्यंत योजनानिहाय सविस्तर आढावा घेण्यात आलेला नाही.

तसेच राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय योजनेची व्दिरुक्ती झाली आहे का? राज्यात एकसारख्या असलेल्या योजना एकत्रित करून त्या अन्य योजनांमध्ये समाविष्ट करून योजना कमी करण्याच्या दृष्टीने पावले उचलणे या करीता जो निकष लावण्यात येणार आहे त्यानुसार राज्यस्तरावर व जिल्हास्तरावर योजनांची व्दिरुक्ती होणे ,तसेच ज्या योजनांचा नियतव्यय मागील ३ वर्षापासुन शुन्य आहे अशा योजना बंद कराव्यात किंवा कसे या सर्व बाबींचा मा. प्रधान सचिव यांना दि. १९.१०.२०१५ रोजी सविस्तर आढावा घेतला असून त्यांनी याबाबत काही सुचना दिल्या आहेत.

शासन परिपत्रक :-

प्रस्तावनेत नमुद बाबी विचारात घेउन नियोजन विभागाचे वेळोवेळी दिलेल्या सुचनांनुसार या विभागातील कार्यरत विविध योजनांचा आढावा घेण्याकरीता खालील बाबीचा विचार करण्याबाबत सुचना या परिपत्रकाव्दारे देण्यात येत आहेत.

१) विभागाकडे कार्यरत असलेल्या विविध योजनांचा सविस्तर आढावा घेण्यात यावा यामध्ये योजनेचे

नाव, योजना कधी सुरू झाली, योजनेचे ठळक वैशिष्टे, योजना कार्यान्वीत करण्याकरीता लागणारे मनुष्य बळ, योजनेवरील मागील ५ वर्षाचा वर्षनिहाय खर्च, या बाबी तपासणे.

२) ज्या योजनेचा आढावा घेण्यात येत आहे तशाच स्वरूपाची योजना केंद्र, राज्य वा जिल्हा नियोजन स्तरावर कार्यरत आहे का

३) अशा योजनेच्या क्षमतेचा पुरेपुर वापर होतो आहे किंवा कसे तसेच अशा योजनांचे यापूर्वी मुल्यमापन झाले आहे का

४) ज्या योजना पुढे चालू ठेवणे किंवा त्याच्या स्वरुपात बदल करणे अथवा सदर योजना अन्य योजनांमध्ये विलिन करणे याबाबत ठोस निर्णया प्रत येणे.

५) जी योजना पुढे चालू ठेवणे आवश्यक आहे अशा योजना सुरळीत चालण्याकरीता काय उपाययोजना करणे आवश्यक आहे या बाबत धोरण ठरविणे.

वरील सर्व बाबींचा एकत्रित पणे समावेश होण्याकरीता सोबत जोडलेल्या विवरण पत्रात नमूद केलेल्या मुद्यानुसार प्रत्येक योजनांबाबत अभ्यासपूर्ण आढावा घेऊन त्याबाबतचा अहवाल सदर परिपत्रक निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांच्या आत वरील विवरणपत्रात शासनास सादर करण्याच्या सूचना देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२११४२१२०६७३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Baliram Balu Chavhan

Digitally signed by Baliram Balu Chavhan
DN: CN = Baliram Balu Chavhan, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Reason: I am the author of this document
Date: 2015.11.04 13:01:10 +05'30'

**ब.बा.चव्हाण**
**उप सचिव**

प्रत,

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
२. मा. मुख्यमंत्रयांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
४. आयुक्त, एकात्मिक बाल विकास योजना, रायगड भवन,नवी मुंबई
५. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
६. सर्व विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास
७. उपआयुक्त (बालविकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे

८. उपआयुक्त (महिला विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
९. उप आयुक्त, (नियोजन), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
१०. सर्व उपआयुक्त, एकात्मिक बाल विकास योजना, रायगड भवन, नवी मुंबई
११. सहाय्यक संचालक, (वित्त व लेखा) आयुक्त, एकात्मिक बाल विकास योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
१२. सहाय्यक संचालक, (वित्त व लेखा) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे.
१३.उपसचिव, महिला व बाल विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय,मुंबई-३२
१४. निवड नस्ती, कार्यासन-०४, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

महिला व बाल कल्याण विभागाच्या योजनांचे आढावा घेण्याचे विवरणपत्र

| अ. क्र. | योजनाचे नाव | योजना सुरु झाल्याचा दिनांक | ठळक वैशिष्टये | लाभार्थ्याचे प्रकार व त्यांची संख्या | योजनेसाठी कार्यरत मनुष्यबळ | योजनेवरील मागील ५ वर्षाचा खर्च | अशा स्वरुपाची राज्य व केंद्राची अन्य योजना आहे का | योजनेच्या क्षमतेचा पूरेपूर वापर आहे का | योजनेचे मूल्यांकन कधी झाले आहे का | अभिप्राय | | | | | योजना सुरळीतपणे चालण्यासाठी उपाय योजना |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | | | | | १२ |
| | | | | | | | | | | योजना पुढे चालू ठेवणे आवश्यक असल्यास त्याबाबचे समर्थन | योजना बंद करणे आवश्यक असल्यास त्याबाबचे समर्थन | योजनेचे स्वरुप बदलावयाचे असल्यास त्याचे समर्थन | योजना दुसऱ्या योजनेत विलिन करावयाची असल्यास कोणत्या योजनेत व त्याचे समर्थन | आवश्यक बदल केल्यानंतर या योजनेत होणारी बचत | |